शालेय शिक्षण विभागासाठी ई -गर्व्हनन्स सल्लागारांची नियुक्ती करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
शालेय शिक्षण व क्रीडा विभाग
शासन निर्णय क्रमांकः ईगव्ह-१५१९/प्र.क्र.२० /संगणक
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक:- २१ जानेवारी, २०२०.

वाचा :-

१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन क्र.मातसं ०८०/४/२०१४/-०/० माहिती व तंत्रज्ञान संचालनालय -DIT (MH), दिनांक ९ मे, २०१९
२) प्रकल्प अंमलबजावणी समितीचे दि.२६.१२.२०१९ रोजीचे इतिवृत्त.

प्रस्तावना :-

शालेय शिक्षण विभागासाठी ई -गर्व्हनन्स प्रकल्पांसाठी नवीन सल्लागार कंपनीची निवड करण्यासाठी दि. २६ डिसेंबर, २०१९ रोजीच्या प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या बैठकीत सादरीकरण घेण्यात आले होते या सादरीकरणात पाच ई-गर्व्हनन्स सल्लागार कंपन्यानी भाग घेतला होता. त्यांपैकी विभागासाठी M/s Price Warehouse Coopers ची नेमणूक करण्याचा निर्णय प्रकल्प अंमलबजावणी समितीने घेतला आहे व त्यानुषंगाने नवीन सल्लागारांच्या नियुक्तीस मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय:-

२. प्रकल्प अंमलबजावणी समितीने दिनांक २६ डिसेंबर, २०१९ रोजीच्या बैठकीत घेतलेल्या निर्णयानुसार ई - गर्व्हनन्स सल्लागार म्हणून वार्षिक मूल्यमापनाच्या अधिन राहून PWC ची दोन वर्षासाठी निवड करण्यात येत आहे.

३. सद्यस्थितीत विभागास आवश्यक सल्लागारांबाबतचा तपशील खालीलप्रमाणे आहे.

| अ.क्र. | सल्लागाराचा प्रकार | नियुक्तीचा प्रकार | सल्लागारांची संख्या | नियुक्तीचे ठिकाण |
|---|---|---|---|---|
| १ | वरिष्ठ सल्लागार | पूर्णवेळ | ५ | मुंबई / पुणे / शासन आवश्यकतेनुसार |

४. उपरोक्त सल्लागारांच्या संख्येत आवश्यकतेनुसार वाढ किंवा घट करण्याचा अधिकार विभागास राहिल तसेच सध्याची नियुक्ती विभागाच्या स्वेच्छाधिकारात मुदतवाढीस पात्र असेल.

५. नियुक्तीच्या अनुषंगाने आवश्यक त्या अटी शर्तीसह सविस्तर कार्य आदेश देण्यात यावेत.

६. सदर सल्लागारांना माहिती व तंत्रज्ञान विभागाने संदर्भ क्र.१ अन्वये विहित केल्यानुसार शुल्क अदा करण्यास मान्यता देण्यात येत आहे. सदर खर्च मागणी क्रमांक. ई-२, २२०२ सर्वसाधारण शिक्षण, ८० पंचवार्षिक योजनांतर्गत योजना (०२) (५१) ई-गव्हर्नन्स कार्यक्रम ( २२०२ H ४५४ ) ३१ सहायक अनुदाने या लेखाशिर्षातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००१२१११२४५९२२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pravin Rajaram Mundhe

Digitally signed by Pravin Rajaram Mundhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education and Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ad4976f306de2810214ec2ea330d9daea59f1d3f45fae9227a3feaa541af10d1, serialNumber=dc78036626ec580d66c0ac502d43af5f670b5ba13f51213ad071acd53714a284, cn=Pravin Rajaram Mundhe
Date: 2020.01.21 11:16:19 +05'30'

**( प्रविण मुंढे )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत :-**

१) मा.राज्यपालांचे सचिव,राजभवन, मुंबई.
२) मा.मंत्री, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, यांचे खाजगी सचिव
३) मा.अप्पर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांचे स्वीय सहायक
४) मा. सचिव, माहिती व तंत्रज्ञान विभाग, मंत्रालय, मुंबई
५) मा.आयुक्त शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
६) राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई.
७) शिक्षण संचालक(माध्य.व उच्च माध्य.),शिक्षण संचालनालय, पुणे.
८) शिक्षण संचालक(प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे.
९) संचालक, महाराष्ट्र राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, पुणे.
१०) शिक्षण संचालक, अल्पसंख्याक व प्रौढ शिक्षण संचालनालय, पुणे.
११) अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ, पुणे.
१२) आयुक्त, महाराष्ट्र राज्य परीक्षा परिषद, पुणे.
१३) वित्त विभाग (व्यय -५) / अर्थसंकल्प शाखा
१४) निवडनस्ती संगणक कार्यासन.